अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांक- एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/ का-६

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०१ ऑक्टोबर, २०२०.

वाचा :-

१. वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्रक्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल,२०२०.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८/का-६, दिनांक १७.४.२०२०.
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्रक्र.६५/अर्थ-३, दिनांक ४.५.२०२०.
४. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८/का-६, दिनांक ११.५.२०२०.
५. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/का-६, दिनांक २०.५.२०२०.
६. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/का-६, दिनांक ११.६.२०२०.
७. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/का-६, दिनांक ३.७.२०२०.
८. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/का-६, दिनांक २८.७.२०२०.
९. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२०/प्र.क्र.१३८ (भाग-१)/का-६, दिनांक २.९.२०२०.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिनस्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येते. केंद्र शासनाकडून विहीत कालावधीत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन आदा करणे शक्य व्हावे, याकरिता अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून, २०१७ रोजी आयोजित बैठकीत अंगणवाडी सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम अपेक्षित केंद्रीय सहाय्य अप्राप्त असले तरी खर्च करण्यास विभागास अनुमती देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये अंगणवाडी सेविका, मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी केंद्र व राज्य हिश्श्यासाठी खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-२ मधील लेखाशीर्ष/उद्दिष्टांकरिता रकाना क्रमांक-५ प्रमाणे एकुण **₹१३३२३.२४ लक्ष (अक्षरी रुपये एकशे तेहतीस कोटी तेवीस लक्ष चोवीस हजार फक्त)** इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | विद्यमान तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | २२३६, पोषण आहार<br>१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प,<br>(०८) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च)<br>केंद्र हिस्सा ६०% (२२३६-१९०९),<br>०२ मजुरी | ३९३१२.४३ | २५०३३.४७ | ४२२०.४७ |
| २ | (०८) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च)<br>राज्य हिस्सा ४०% (२२३६-१९१८),<br>०२ मजुरी | २७५२०.९४ | १८५००.०० | २८१३.९८ |
| ३ | (०८) (०५) अंगणवाडी सेवा,<br>अतिरिक्त राज्य हिस्सा १००%<br>(२२३६-१९४५),<br>०२ मजुरी | ५६४१६.६३ | ३७०००.०० | ६२८८.२९ |
| | **एकूण** | **१२३२५०.००** | **८०५३३.४७** | **१३३२३.२४** |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५७/व्यय-६, दिनांक ३०.९.२०२० अन्वये त्या विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०१००११६२११७५३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.10.01 16:23:28 +05'30'

( र. सि. जरांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

५. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
६. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व जिल्हाधिकारी
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
९. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) (जिल्हा परिषद)
१०. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.
११. वित्त विभाग (व्यय-६, अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१२. नियोजन विभाग (का-१४७२), मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती, का-६, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.